मौजे कामेरी (ता. वाळवा, जि. सांगली )
येथिल नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत
अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र. पापुयो -२२१७/प्र.क्र. ४२/पापु १७**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीखः १९ एप्रिल, २०१७.**

**वाचा -**

१) ग्रामसभा ठराव क्र. २०, दि. १५ ऑगस्ट, २००८.
२) अधिक्षक अभियंता, भारत निर्माण समन्वय व संनियंत्रण कक्ष, पुणे-१ यांचे पत्र क्र. भानिक/तांशा/१०/२०१४, दि. २८/५/२०१४.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांचे पत्र क्र. ग्रापापु/तांशा-१/२०९०/२०१४, दि. ६/९/२०१४.
४) कार्यकारी अभियंता, ग्रा.पा.पु.वि., जिल्हा परिषद, सांगली यांचे क्र. जिपसां/ग्रापापु/तांशा-५/७३६/२०१७, दि. ३०/३/२०१७.

**प्रस्तावना**

**मौजे कामेरी (ता. वाळवा, जि. सांगली ) येथील** नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.२,२३,१६,७७४/- (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील ग्रामसभेच्या दिनांक १५/८/२००८ च्या ठरावाद्वारे मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी सदर योजनेच्या कामाच्या जादा दराच्या निविदा प्राप्त झाल्यामुळे व कामाच्या व्याप्तीत झालेल्या बदलामुळे खर्चात वाढ झाली. **अधिक्षक** अभियंता, **भारत निर्माण समन्वय व संनियंत्रण कक्ष, पुणे-१ यांनी** संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये प्रस्तुत योजनेच्या **रु.** २,६९,६२,९८२/-**(ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. परिणामी, **मुख्य कार्यकारी अधिकारी,** जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.३ अन्वये शासनास सादर केला होता. तथापि, कार्यकारी अभियंता, ग्रा.पा.पु.वि., जिल्हा परिषद, सांगली संदर्भ क्र. ४ येथिल पत्रान्वये योजनेचा अंदाजपत्रकीय खर्च कमी करुन रु. २,५६,५८,५२५/- इतक्या सुधारीत अंदाजपत्रकास मान्यता देण्याची विनंती केली. त्यानुसार, सदर योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

**मौजे कामेरी (ता. वाळवा, जि. सांगली )** येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. २,५६,५८,५२५/-(ढोबळ)** (**अक्षरी रुपये दोन कोटी छप्पन्न लक्ष अठ्ठावन्न हजार पाचशे पंचवीस फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सांगली यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना

आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. ३३,४१,७५१/- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष एक्केचाळीस हजार सातशे एक्कावन्न फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१९१२०१३८३३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dnyaneshwar M Jawale

Digitally signed by Dnyaneshwar M Jawale
DN: CN = Dnyaneshwar M Jawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.04.19 13:14:17 +05'30'

**( ज्ञा. म्हा. जावळे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) जिल्हाधिकारी, सांगली.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली
६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई

८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
९) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सांगली.
१०) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सांगली.
११) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, सांगली
१२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सांगली
१३) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
११) १७) निवडनस्ती कार्यासन पापु-१७.